**उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला यांच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील ४११ अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक-जिरुप-२९१०/२९८/प्र.क्र. १२६/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक- पदआ २००७/प्र.क्र.११७/सेवा १, दिनांक ६.८.२००७.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**शासन निर्णय :** उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या संचालक, आरोग्य सेवा, मुंबई (मुख्यालय) व त्यांचे अधिपत्याखालील १५ कार्यक्रम प्रमुखांच्या कार्यालयातील पदांच्या सुधारित आकृतिबंधामध्ये समावेश करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अखत्यारितील अकोला -५६, अमरावती-१०४, बुलढाणा-१००, यवतमाळ-१०३ व वाशिम-४८ या ५ जिल्ह्यांतील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ ची एकूण ४११ अस्थाई पदे अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती.

२. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** अकोला -५६, अमरावती-१०४, बुलढाणा-१००, यवतमाळ-१०३ व वाशिम-४८ या ५ जिल्ह्यांतील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ च्या एकूण ४११ अस्थाई पदांना दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २००९-२०१० या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १**

| | | |
|---|---|---|
| २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य. |
| ०६ | - | सार्वजनिक आरोग्य |
| ००१ | - | संचालन व प्रशासन |
| ००१(चार) | - | गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१)" |

४. हा निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक- असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१९५२५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुहास रा. चव्हाण)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय) मुंबई / सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
जिल्हा शल्य चिकित्सक, अकोला /अमरावती /बुलढाणा /यवतमाळ /वाशिम
जिल्हा आरोग्य अधिकारी, अकोला /अमरावती /बुलढाणा /यवतमाळ /वाशिम
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला /अमरावती /बुलढाणा /यवतमाळ /वाशिम
वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई. / निवडनस्ती (आ-३